**सन २०११-२०१२ या गाळप हंगामात राज्यातील ८ सहकारी साखर कारखान्यांना अल्प मुदत कर्ज व त्यावरील व्याजाच्या परतफेडीस शासन थकहमी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**

शासन निर्णय क्रमांक - शाहमी २०११/सपवव/प्र.क्र.६९ /अर्थबळ.
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
**दिनांक :-** १५ नोव्हेंबर, २०११.

**वाचा:-** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शासन हमी १०९९/प्र.क्र.६८/शासन हमी, दिनांक ५/११/९९

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:शाहमी १००८/ प्र.क्र.१८/शा हमी, दिनांक २८/४/२००८

३) साखर आयुक्तालयाचे पत्र क्रमांक:साआ/प्र.क्र.१३/ पू.हं.अ.मु./कक्ष-७/अर्थ-२, दिनांक ५/१०/२०११.

४) महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्यादित, मुंबई यांचे पत्र क्र. कृ औवि/शर्करा/फा-१०८/ ११३३/ २०११-१२, दिनांक २०/१०/२०११ .

५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका-१०११/प्र.क्र.२०२/३स, दिनांक ५/११/२०११.

६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शाहमी-२०११/सपवव/प्र.क्र.६९/अर्थबळ, दिनांक १९.९.२०११.

**<u>शासन निर्णय:-</u>**

गाळप हंगाम २०११-१२ साठी उक्त वाचा क्रमांक-६ मधील महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडील ६ सहकारी साखर कारखान्यांना वाढीव अल्प मुदत कर्ज (प्रपत्र अ) तसेच महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडील एक व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेकडील १ (प्रपत्र-ब) अशा एकुण ८ सहकारी साखर कारखान्यांना रु.२१९०.०० लाख ( रुपये एकवीस कोटी नव्वद लाख फक्त) एवढे अल्प मुदत कर्ज व त्यावरील व्याज रु. २२९.९५लाख ( रुपये दोन कोटी एकोणतीस लाख पंच्याण्णव हजार फक्त) अशा एकुण रु.२४१९.९५ लाख ( रुपये चोवीस कोटी, एकोणीस लाख, पंच्याण्णव हजार फक्त) एवढया रक्कमेच्या उत्तरदायित्वाच्या परतफेडीस पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन थकहमी देण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२.१ अ) सदर कारखान्यांवर संबंधित महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई / जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेच्या कर्ज मंजूरीच्या अटी तसेच साखर आयुक्त यांनी नमूद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक राहतील. महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म.मुंबई यांना नाबार्डच्या कर्ज मंजूरीच्या अटी बंधनकारक राहतील. कर्ज संवितरित करण्यापूर्वी बँकेने करारनामा करुन घ्यावा.

ब) अनावश्यक खर्च टाळून आवश्यक त्या बाबींचे प्राथम्य ठरवून, कमीत कमी खर्च करणे सदर कारखान्यावर बंधनकारक राहील.

क) राज्य शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय सदर कारखान्यांना या बाबीसाठी अधिक कर्ज उभारता येणार नाही.

ड) सदर सहकारी साखर कारखान्यांची मालतारण खाती नुतनीकरणासाठी पात्र असावीत.

इ) सदर सहकारी साखर कारखान्यांनी यापूर्वी घेतलेली हमी आवाहनित झालेली नसावी.

ई) सदर थकहमी दिलेल्या साखर कारखान्यांनी कोणत्या कार्यक्षेत्रात किती ऊसाचे गाळप करणे बंधनकारक राहील हे साखर आयुक्त यांनी निश्चित करुन दयावे. त्यापेक्षा कमी गाळप करुन किंवा मध्यंतरी कारखाना बंद केल्यास संबंधित बँकांनी वरीलप्रमाणे थकहमीवर दिलेल्या कर्जाची सक्तीने वसूली करावी व साखर आयुक्तांनी त्या त्या कारखान्याविरुध्द कायदेशीर कार्यवाही करावी.

प) थकहमी दिलेले कर्ज एकाच वेळी बँकानी वितरीत न करता गाळप हंगामाच्या पूर्व तयारीची प्रगती लक्षात घेऊन कर्जाची रक्कम वितरीत करण्यात यावी.

फ) संबंधित बँकानी वरीलप्रमाणे थकहमी दिलेल्या कर्जाची व्याजासह वसूली हंगाम संपण्यापूर्वी प्राधान्याने करावी. त्याशिवाय बँकाना इतर कर्जाची वसूली करता येणार नाही.

२.२ महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक म., मुंबई व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तीचा समावेश करण्यात यावा.

१) संबंधित सहकारी साखर कारखाने प्रमुख ऋणको (Prinicipal Debtor) राहतील.

२) संबंधित कारखान्यांना शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय इतर कोणतेही कर्ज उभारणार नाही.

३) सदर थकहमीची मुदत हमी दिल्यापासून दि.३१/१०/२०१२ पर्यंत वैध राहील. ही हमी कारखान्यास मंजूर करण्यात येणाऱ्या हमी रक्कमेइतक्या कर्जाच्या रक्कमेपुरतीच सिमित राहील.

४) कर्जाची परतफेड करण्यास विलंब / कसूर झाल्यास शासन हमी अवैध होईल. तसेच इतर कोणत्याही देय रक्कमेसाठी शासन हमी लागू होणार नाही.

५) सदर शासन हमीवरील कर्ज वसूलीकरीता साखरेचा पुरेसा साठा व इतर माल तारण / मत्ता प्रतिभूती म्हणून घेतल्यानंतर कर्ज मंजूर करण्यात यावे. साखर साठयाचे कोणत्याही प्रकारे नुकसान होणार नाही व त्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी बँक घेईल व या साठयाचे संरक्षण होईल याची व्यवस्था करील.

६) कारखान्याने उत्पादीत केलेल्या सर्व साखरेची विक्री शासन हमीवर कर्ज देणाऱ्या धनको बँकामार्फत त्यांचे बँकेत एक स्वतंत्र Escrow Account व्दारे करण्यात यावी व या विक्रीपैकी प्रति क्विंटल रुपये २००/- टँगीग करुन प्राप्त होणारी रक्कम कर्ज खाती जमा करावी. या कर्ज खात्यामधील जमा निधीचा उपयोग फक्त या आदेशाव्दारे शासन हमीवर दिलेले कर्ज, त्यावरील व्याज व शासन हमी शुल्क या देय रकमाकरीता करता येईल.

७) कर्जाच्या परतफेडीबाबत होणाऱ्या कसूरीची सूचना शासनास ९० दिवसांच्या आत देणे सबंधित बँकेला बंधनकारक राहील.

८) संबंधित बँकांनी संबंधित कारखान्याकडून कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय बँकेला हमी पूर्ततेकरीता शासन हमीचा प्रतिभूती म्हणून वापर करता येणार नाही. संबंधित

कारखान्याच्या चल/ अचल मालमत्तेची विक्री अथवा लिलाव करुन वसूली करण्याचा निर्णय बॅकांनी घेतल्यास, त्याकरिता एक समिती गठित करण्यात यावी व या समितीमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभागाचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा. विक्री प्रक्रियेचे अंतिमीकरण शासनाच्या मान्यतेने करण्यात यावे.

९) कारखान्यांना मंजूर केलेल्या कर्जाच्या परतफेडीच्या वेळापत्रकानुसार (Input Profroma) कर्ज फेडीच्या शेवटच्या दिनाका पर्यंत परतफेड होणे आवश्यक राहील. वैध कालावधीनंतर बँकेला शासन हमी आवाहनित करता येणार नाही. सदर कालावधीमध्ये तारण म्हणून घेतलेल्या साखर साठयाच्या विक्रीमधून कर्जाची वसूली करण्याची जबाबदारी संपूर्णपणे धनको बँकांची राहील.

१०) धनको बँका सदर कारखान्याच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल वैध कालावधीपर्यंत शासनास दर सहा महिन्यानी (३० मार्च/३० सप्टेंबर) सोबत जोडलेल्या विवरणपत्र **ANNEXTURE "A"** मध्ये सादर करतील.

११) धनको बँकांनी कर्ज फेडीची स्थिती दर्शविणारी माहिती दर तीन महिन्यांनी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग तसेच वित्त विभागाकडे सादर करावी.

१२) नियत दिनांकास हमीशुल्क वसुल करण्याची व शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव (सहकार ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांची राहील.

१३) संबंधित बँकाकडून घ्यावयाच्या कर्जाचा व्याजदर कमीत कमी असेल, याची खात्री करण्याची संपूर्ण जबाबदारी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाची राहील.

१४) संबंधित कारखान्याकडून थकीत /देय हमी शुल्काचा भरणा प्रथम करण्यात येईल.

## ३. <u>हमी शुल्क</u>

सदर हमी शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ५/११/१९९९ मध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटी व शर्तीच्या अधिन राहील

(अ) संबंधित सहकारी साखर कारखान्यास प्रतिशत प्रतिवर्षी हमी शुल्काचा दर वित्त विभागाच्या दिनांक ५/११/१९९९ च्या शासन निर्णयानुसार राहील.

(ब) हमीशुल्क ज्या कालावधीकरीता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर (total maximum outstanding amount) देय राहील. हमीशुल्काच्या परिगणनेसाठी, महिन्यातील १५ दिवसापेक्षा कमी दिवस वगळण्यात यावेत आणि १५ दिवस किंवा त्यापेक्षा अधिक दिवसांचा कालावधी पूर्ण महिना म्हणून धरण्यात यावा. हमी मंजूर केलेल्या शासन निर्णयाचा दिनांक आणि कर्जरोख्याची प्रत्यक्ष उभारणी यामध्ये मंदनअवधी (Time Lag ) असला तरी हमीशुल्क, हमी दिल्याच्या दिनांकापासून उपरोक्त कार्यपध्दतीनुसार भरावे.

(क) हमी शुल्काचा भरणा दर ६ महिन्यांनी करण्यास सबंधित कारखान्याचे व्यवस्थापकीय संचालक हे जबाबदार असतील, प्रत्येक वित्तिय वर्षाच्या ३१ मार्च/ ३० सप्टेबर रोजी अदत्त असलेल्या घटना साक्षेप दायित्वावर (Contingent Liablility) अनुज्ञेय असलेल्या हमी शुल्काचा भरणा १ एप्रिल / १ ऑक्टोबर, रोजी करावा.

(ड) हमी शुल्काचा भरणा केल्यानंतर त्यामधून थकित हमी शुल्कावरील दंडनीय व्याजाची रक्कम वळती करुन घेण्यात येईल. नंतर सर्वात जुन्या थकित हमी शुल्काची वसूली ,त्यानंतर त्यापेक्षा कमी जुन्या थकित हमी शुल्काची वसूली याप्रमाणे रक्कम वळती करुन घेण्यात येईल.

(इ) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास कारखान्याकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकित रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व पुढील काळासाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

(ई) बँकेने शासनाच्या "००७५- संकीर्ण, सर्वसाधारण सेवा -१०८ - हमी शुल्क " या लेखाशिर्षाखाली साखर कारखान्याकडून देय असलेल्या हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याची खात्री करुन घ्यावी.

(उ) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ कारखान्याने चलनाची साक्षांकित प्रत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभागास साक्षेपाने पाठवावी.

४. वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक शासन हमी-१०९९/प्र.क्र.६८/ शासन हमी दिनांक ५/११/१९९९ अन्वये विहीत केलेले निविष्ठी प्रपत्र सोबत जोडले आहे.

५. महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक मर्यादित, मुंबई व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांसमवेत करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरीता सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागातील सह सचिव/ उप सचिव आणि वित्त विभागातील उप सचिव ( शासन हमी ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे

६. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (३ स) यांची नस्ती क्रमांक :ससाका-१०११/प्र.क्र.२०२/भाग-३/३ स, वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्रमांक-१०/२०११-२०१२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध असून, त्यांचा साकेतांक **क्रमांक २०१११११६०५१८३९००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,**

**(मृनल पेडणेकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) राज्यपालाचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
४) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
५) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,

६) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती)
९) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई,
१०) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईन्ट, मुंबई-२०,
११) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भुवन, एस.व्ही.पटेल रोड,मुंबई-४०० ००४,
१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३,
१३) इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन,काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५,
१४) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२१,
१५) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८,
१६) प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२०) अध्यक्ष / कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या.,मुंबई.
२१) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ, मर्या.,साखर भवन, नरिमन पॉईंट, मुंबई.
२२) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२३) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२४) अध्यक्ष / कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या.,सिंधुदूर्ग ,
२५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ, मर्या.,साखर भवन, नरिमन पॉईंट, मुंबई.
२६) कार्यकारी संचालक, स्वामी समर्थ, सहकारी साखर कारखाना, जि. सोलापूर.
२७) कार्यकारी संचालक, अगस्ती स.सा.का. जि. अहमदनगर.
२८) कार्यकारी संचालक, राजगड स. सा. का. जि. पुणे.
२९) कार्यकारी संचालक, अंबेजोगाई स. सा. का. जि. बीड.
३०) कार्यकारी संचालक, वसंत स. सा. का. जि. यवतमाळ.
३१) कार्यकारी संचालक, गणेश स. सा. का. जि. अहमदनगर.
३२) कार्यकारी संचालक, पद्मश्री डी. वाय. पाटील स. सा. का. जि.कोल्हापूर.
३३) कार्यकारी संचालक, मोहनराव शिंदे स. सा. का. जि. सांगली.
३४) वित्त विभाग, व्यय-२/ऋण व हमी संनियंत्रण कक्ष , मंत्रालय, मुंबई.
३५) कक्ष अधिकारी-३स/१६ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
३६) निवडनस्ती - अर्थबळ.

******

## तक्ता - अ

**(महाराष्ट्र राज्य सहकारी बँक)**

नक्त मूल्य (-) उणे असलेले व मागील गाळप हंगाम घेतलेले, ५० टक्केपेक्षा जास्त ऊस उपलब्ध असलेल्या सहकारी साखर कारखान्यांना वाढीव अल्प मुदत कर्ज तपशिल

**( रुपये लाखात )**

| अ.क्र. | सहकारी साखर कारखान्याचे नांव | वाढीव अल्प मुदत कर्ज | | |
|---|---|---|---|---|
| | | मुद्दल | व्याज | एकूण |
| १ | स्वामी समर्थ सोलापूर | २७०.०० | २८.३५ | २९८.३५ |
| २ | अगस्ती,अहमदनगर | १५०.०० | १५.७५ | १६५.७५ |
| ३ | वसंत पुसद, यवतमाळ | १००.०० | १०.५० | ११०.५० |
| ४ | गणेश अहमदनगर | २२०.०० | २३.१० | २४३.१० |
| ५ | अंबाजोगाई,बीड | २००.०० | २१.०० | २२१.०० |
| ६ | राजगड,पुणे | २००.०० | २१.०० | २२१.०० |
| | **एकुण** | **११४०.००** | **११९.७०** | **१२५९.७०** |

## तक्ता -ब

**( महाराष्ट्र राज्य सहकारी बँक/जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक)**

नक्त मूल्य (-) उणे असलेले व मागील गाळप हंगाम घेतलेले,५० टक्केपेक्षा जास्त ऊस उपलब्ध असलेल्या सहकारी साखर कारखान्याना अल्प मुदत कर्ज तपशिल

**( रुपये लाखात )**

| अ.क्र. | सहकारी साखर कारखान्याचे नांव | अल्प मुदत कर्ज | | |
|---|---|---|---|---|
| | | मुद्दल | व्याज | एकूण |
| १ | मोहनराव शिंदे,सांगली (महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म.) | ८००.०० | ८४.०० | ८८४.०० |
| २ | पद्मश्री डी.वाय.पाटील,कोल्हापूर (सिंधुदुर्ग जिल्हा मध्यवर्ती सह.बँक) | २५०.०० | २६.२५ | २७६.२५ |
| | **एकुण** | **१०५०.००** | **११०.२५** | **११६०.२५** |